**दिवंगत श्री बाजीराव श्रीपती पोमणे, सेवानिवृत्त सहायक फौजदार यांच्या तृत्तीय पत्नी श्रीमती आनंदीबाई पोमणे यांना कुटुंब निवृत्तीवेतन मंजूर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : कुनिवे-०६१४/प्र.क्र.७७/आस्था-१**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : १७ एप्रिल, २०१५.

वाचा :-१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक : सेनिवे-१००८/९६/सेवा-४, दि. ३.११.२००८.

२) पोलीस अधीक्षक, पुणे ग्रामीण यांचे कार्यालयाचे पत्र क्र.लेशा/पेन्शन/पोमणे/१८७८/२०१३/, दि. १३.०८.२०१३.

प्रस्तावना :

दिवंगत श्री बाजीराव श्रीपती पोमणे, सेवानिवृत्त सहायक फौजदार यांचे दि. १७.०१.२०१० रोजी निधन झाले आहे. दिवंगत श्री पोमणे यांच्या पहिल्या पत्नी श्रीमती बबई बाजीराव पोमणे यांचे निधन दि. १९.११.१९८३ रोजी झाले आहे. दिवंगत श्री पोमणे यांच्या दुस-या पत्नी श्रीमती जनाबाई बाजीराव पोमणे यांचे दि. १५.११.१९८६ रोजी निधन झाले आहे. सेवानिवृत्त पोमणे यांचा तिसरा विवाह श्रीमती आनंदीबाई बाजीराव पोमणे यांचेशी दि. ६.०६.१९८७ रोजी झाला आहे.

२. श्रीमती आनंदीबाई यांचे बाजीराम पोमणे यांचे बरोबर दि. ६.०६.१९८७ रोजी विवाह झालेचे प्रतिज्ञापत्र सादर केले आहे. श्रीमती आनंदीबाई यांचा विवाह पहिल्या व दुस-या पत्नीचे निधनानंतर झालेचे दिसुन येते. मे. दिवाणी न्यायाधिश, वरिष्ठ स्तर बारामती यांनी दिलेल्या वारसा हक्क प्रमाणपत्रामध्ये दिवंगत पोमणे यांच्या ५ अपत्यासह श्रीमती आनंदीबाई यांना दिवंगत बाजीराव पोमणे यांचे वारस म्हणुन घोषित केले आहे. तसेच, श्री. पोमणे यांनी दि. ४.१२.२००९ च्या पत्रान्व्ये पत्नी श्रीमती आनंदीबाई यांचे नांव कुटूंब निवृत्तीवेतनकरिता वारस म्हणून नोंदविण्याबाबत लेखी विनंती केली आहे.

३. दिवंगत श्री. पोमणे यांचा तिसरा विवाह हा पहिल्या दोन पत्नींच्या निधनानंतर झालेला आहे. तसेच, तृत्तीय पत्नी श्रीमती आनंदीबाई यांचे नाव निवृत्तीवेतनकरिता वारस म्हणुन नोंदविण्याबाबत श्री. पोमणे हे हयात असताना केलेली लेखी विनंती व म.ना.से.( निवृत्तीवेतन ) नियम १९८२ मधील नियम ११६ या सर्व बाबी विचारात घेता दिवंगत श्री. पोमणे यांच्या तृत्तीय पत्नी श्रीमती आनंदीबाई यांना कुटुंबनिवृत्तीवेतन देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय** :

दिवंगत श्री. बाजीराव श्रीपती पोमणे, सेवानिवृत्त सहायक फौजदार यांच्या तृत्तीय पत्नी श्रीमती आनंदीबाई यांना कुटुंब निवृत्तीवेतन देण्यास शासन मान्यता देत आहे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. ९१/सेवा-७, दि. १८.०३.२०१५ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४१७१७४९३७३२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Yuvraj Bayaji Ajetrao

Digitally signed by Yuvraj Bayaji Ajetrao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Yuvraj Bayaji Ajetrao
Date: 2015.04.17 18:00:59 +05'30'

**( युवराज अजेटराव )**

अवर सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. पोलीस अधिक्षक, पुणे ( ग्रामीण ), पुणे.
३. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा )-१/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
४. अवर सचिव, सेवा-७, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
५. दिवंगत श्री बाजीराव श्रीपती पोमणे, सेवानिवृत्त सहायक फौजदार यांच्या पत्नी श्रीमती आनंदीबाई यांना पोलीस अधिक्षक, पुणे ( ग्रामीण ), पुणे यांच्या कार्यालयामार्फत.
६. कोषागार अधिकारी, पुणे.
७. निवड नस्ती ( आस्था-१).